नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे शेड क्र. २ च्या
कामास प्रशासकिय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी-३५९६/२/१७/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- २८ जानेवारी ९७

वाचा:- कारागृह महानिरीक्षक, यांचे क्र. कारखाना योजना/९३-९७ /क-६[१]
दिनांक ३१. १. ९६ चे पत्र.

निर्णय:- नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे शेड क्र. २ च्या कामास लागणा-या रु. ९,,००,८००, [नउ लाख आठशे] एवढ्या खर्चाच्या अंदाजपत्रक नकाशे यास शासन या आदेशाव्दारे खालील अटीच्या अधीन राहून प्रशासकिय मान्यता देत आहे.

१] यापूर्वी प्रशासकिय मान्यता दिलेली कामे प्राधान्याने हाती घेऊन नंतरच संदर्भाधीन काम हाती घ्यावे.

२] प्रस्तुत कामासाठी अर्थसंकल्पात पुरेशी तरतुद केल्याखेरीज प्रत्यक्षात काम हाती घेऊ नये

३] काम नविन स्वरुपाचे असल्याने ते विधान मंडळाच्या नजरेस आणावे.

४] काम चालू वर्षी हाती घ्यावयाचे असल्यास वार्षिक योजना १९९६-९७ मध्ये "सामान्य सेवा" या उपशिर्षाखाली गृह विभागासाठी उपलब्ध असलेल्या अंतिम तरतुदीच्या अधीन राहून प्रस्तावाचा खर्च भागवावा. यासाठी अतिरिक्त तरतुद उपलब्ध करुन दिली जाणार नाही.

२. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती १०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना तुरुंग मागणी क्र. एच-१५ या लेखाशिर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १. ६. ९२ सोबतच्या परिशिष्ठ अनु क्र. १ प्र.क्र. १३४ नियमाच्या रकाना ६ मधील अटीच्या अधीन राहून प्रशासकिय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भान्वये अनुक्रमे क्र. ७४ इमारती २ दिनांक ११. ३. ९६ क्र. ४२०/१४११ दिनांक ८. १०. ९६ व क्र. सीआर- ७१२/९६ व्यय-८ दिनांक२. ११. ९६ अन्वये त्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ शं. य. सोनवणे ]
अवर सचिव महाराष्ट्र शासन, गृहविभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे [मुख्यालय]

कारागृह उपमहानिरीक्षक ~~[illegible]~~ पूर्व विभाग ~~पुणे~~ नागपूर

अधिक्षक नागपूर मध्यवर्ती कारागृह ~~कर~~ नागपूर [सोबत नकाशे व अंदाजपत्रक जोडले आहेत. ]

महालेखापाल-१, ~~महालेखाकार~~ महाराष्ट्र [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई/नागपूर.

महालेखापाल-१, महाराष्ट्र लेखा व परीक्षा ] मुंबई/नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर

सार्वजनिक बांधकाम विभाग इमारत -२ अर्थ-२,

नियोजन विभाग-१४११

वित्त विभाग व्यय-८

निवड नस्ती-८.